

## १. गणपतीची आरती

सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची ।। नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची ।। सर्वांगी सुंदर उटि शेंदुराची ।। कंठीं झळके माळ मुक्ताफळांची ।। १ ।। जय देव जय देव जय मंगलमूर्ती ।। दर्शनमात्रें मनकामना पुरती ।। धृ० ।। रत्नखचित फरा तुज गौरीकुमरा ।। चंदनाची उटी कुंकुमकेशरा ।। हिरेजडित मुगुट शोभतो बरा ।। रुणझुणती नूपुरें चरणीं घागरिया ।। जय ।। २ ।। लंबोदर पितांबर फणिवरबंधना ।। सरळ सोंड वक्रतुंड त्रिनयना ।। दास रामाचा वाट पाहे सदना ।। संकटी पावावें निर्वाणी रक्षावें सुरवरवंदना ।। जय देव जय देव जय मंगलमूर्ती ।। दर्शन० ।। ३ ।।

## ५. शंकराची आरती

(२)

लवथवती विक्राळा ब्रह्मांडीं माळा।। विषें कंठ काळा त्रिनेत्रीं ज्वाळा।। लावण्यसुंदर मस्तकीं बाळा।। तेथुनियां जळ निर्मळ वाहे झुळझूळां।।१।। जय देव जय देव श्रीशंकरा।। आरती ओवाळूं तुज कर्पुरगौरा।।धृ०।। कर्पुरगौरा भोळा नयनीं विशाळा।। अर्धांगीं पार्वती सुमनांच्या माळा।। विभूतीचें उधळण शितिकंठ नीळा।। ऐसा शंकर शोभे उमावेल्हाळा।।जय०।।२।। देंवी दैत्यीं सागरमंथन पैं केलें।। त्यामाजीं अवचित हलाहल उठिलें। तें त्वां असुरपणें प्राशन केलें।। नीलकंठ नाम प्रसिद्ध झालें।।जय०।।३।। व्याघ्रांबर फणिवरधर सुंदर मदनारी।। पंचानन मनमोहन मुनिजनसुखकारी।। शतकोटींचें बीज वाचे उच्चारी।। रघुकुळटिळक रामदासा अंतरीं।।जय०।।४।।

# २३. पांडुरंगाची आरती



युगें अठ्ठावीस विटेवरी उभा ।। वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा ।। पुंडलिकाचे भेटी परब्रह्म आलें गा ।। चरणीं वाहे भीमा उद्धरीं जगा ।। १ ।। जय देव जय देव जय पांडुरंगा ।। रखुमाईवल्लभा राईच्या वल्लभा पावें जिवलगा ।। जय ।। धृ० ।। तुळसीमाळा गळां कर ठेवुनि कटीं ।। कांसे पीतांबर कस्तुरि लल्लाटीं ।। देव सुरवर नित्य येती भेटी ।।

गरुड हनुमंत पुढें उभे राहती ।।जय० ।। २ ।। धन्य वेणूनाद अनुक्षेत्रपाळा ।। सुवर्णाची कमळें वनमाळा गळां ।। राई रखुमाबाई राणीया सकळा ।। ओंवाळीती राजा विठोबा सांवळा ।।जय० ।। ३ ।। ओंवाळूं आरत्या कुरवंड्या येती ।। चंद्रभागेमाजी सोडुनियां देती ।। दिंड्या पताका वैष्णव नाचती ।। पंढरीचा महिमा वर्णावा किती ।। जय० ।। ४ ।। आषाढी कार्तिकी भक्तजन येती ।। चंद्रभागेमाजीं स्नानें जे करिती ।। दर्शन हेळामात्रे तयां होय मुक्ती ।। केशवासी नामदेव भावें ओवाळिती ।। ५ ।।

# ९. दुर्गादेवीची आरती

दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारीं।। अनाथनाथें अंबे करुणा विस्तारीं।। वारीं वारीं जन्ममरणातें वारीं।। हारीं पडलों आता संकट नीवारीं।।१।। जय देवी जय देवी महिषासुरमथिनी।। सुरवरईश्वरवरदे तारक संजीवनी।। जय०।।धृ०।। त्रिभुवनभुवनीं पहातां तुजऐसी नाहीं। चारी श्रमले परंतु न बोलवे कांहीं।। साही विवाद करितां पडले प्रवाहीं।। ते तूं भक्तांलागीं पावसि लवलाही।।जय०।।२।। प्रसन्नवदने प्रसन्न होसी निजदासा।। क्लेशांपासूनी सोडवी तोडीं भवपाशा।। अंबे तुजवाचून कोण पुरविल आशा।। नरहरि तल्लिन झाला पदपंकज लेशा।। जय०।।३।।

## २४. विठ्ठलाची आरती



येई गे विठ्ठले माझे माउलीचे ।। निढळावरी कर ठेवुनि वाट मी पाहें ।।धृ० ।। आलिया गेलिया हातीं धाडीं निरोप ।। पंढरपुरीं आहे माझा मायबाप ।। येई० ।। १ ।। पिवळा पीतांबर कैसा गगनीं झळकला ।। गरुडावरी बैसूनि माझा कैवारी आला ।। येई० ।। २ ।। विठोबाचें राज्य आम्हां नित्य दिपवाळी ।। विष्णुदास नामा जीवें भावें ओवाळीं ।। येई० ।। ३ ।।

## ४८. प्रार्थना

घालीन लोटांगण वंदीन चरण ।। डोळ्यांनि पाहिन रूप तुझे ।। प्रेमें आलिंगन आनंदे पूजिन ।। भावें ओंवाळिन म्हणे नामा ।। १ ।। त्वमेव माता च पिता त्वमेव, त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव ।। त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव, त्वमेव सर्वं मम देव देव ।। २ ।। कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा, बुद्धयात्मना वा प्रकृतिस्वभावत् करोमि यद्यत् सकलं परस्मै, नारायणायेति समर्पयामि ।। ३ ।। अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं हरि ।। श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे ।। ४ ।। हरे राम हरे राम राम राम हरे हरे ।। हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ।। ५ ।।